(5)

GR-200407191838001-2500

एकात्मिक बाल विकास सेवा यशस्वीपणे व सुरळीततपणे राबविणेसाठी प्रकल्पांतील कार्यरत अंगणवाडी कार्यकर्ती व मदतनीस यांच्या अडचणी/तक्रारी निवारण करण्यासंदर्भात राज्य व जिल्हा स्तरावर अडचणी निवारण समित स्थापन करणे.

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक एबावि 2000/ प्र 355/ का 6
नवीन प्रशासन भवन, 3 रा मजला,
मुंबई -400 032.
दिनांक :- 24/1/ 2001.

वाचा - 1. केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, महिला व बाल विकास विभाग, नवी दिल्ली पत्र क्रमांक 1-9/2000-CD-I , दिनांक 14 ऑगस्ट 2000
2. केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, महिला व बाल विकास विभाग, नवी दिल्ली पत्र क्रमांक 1-9/2000-CD-I , दिनांक 19 ऑक्टोबर 2000

24

**प्रस्तावना** - एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना राज्यांमध्ये 1975 पासून नागरी, ग्रामीण व आदिवासी प्रकल्पात राबविली जात आहे. या योजने अंतर्गत 0 ते 6 वयोगटातील मुले, गर्भवती स्त्रिया व स्तनदा माता यांना पूरक पोषण आहार, लसीकरण, आरोग्य तपासणी, संदर्भ आरोग्य सेवा, अनौपचारिक शिक्षण व आरोग्य आणि सकस आहार या सेवा अंगणवाडी कार्यकर्ती व मदतनीस यांच्यामार्फत पुरविल्या जातात. अंगणवाडी कार्यकर्ती व मदतनीस या स्थानिक रहिवासी असल्यामुळे त्यांचा गावातील रहिवाश्यांशी सतत संपर्क येत असतो त्यामुळे त्या गावांतील लोक व शासन यांच्यामधील महत्वाचा दुवा आहेत. ही योजना यशस्वीपणे व सुरळीतपणे राबविण्यामध्ये यांचा महत्वाचा सहभाग असल्यामुळे त्यांना कार्य करीत असताना येणा-या अडचणी व तक्रारी यांचे निवारण करण्यासाठी व सदर योजना यशस्वीपणे राबविण्यासाठी राज्यात राज्य स्तरावर व जिल्हा स्तरावर समिती स्थापन करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** - या संदर्भात केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार एकात्मिक बाल विकास सेवा या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत प्रकल्पातील कार्यरत अंगणवाडी कार्यकर्ती व मदतनीस यांच्या अडीअडचणी/तक्रारी यांचे निवारण करण्यासाठी राज्य व जिल्हा स्तरावर खालीलप्रमाणे अडचणी निवारण समिती स्थापन करण्यात येत आहे :

**राज्य स्तरीय अडचणी निवारण समिती**

| | | |
|---|---|---|
| 1. | मा. मंत्री, महिला व बाल विकास | अध्यक्ष |
| 2. | मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास | उपाध्यक्ष |
| 3. | मा. प्रधान सचिव (म व बा वि) | सदस्य |
| 4. | उप सचिव, महिला व बाल विकास विभाग | सदस्य |
| 5. | अंगणवाडी कार्यकर्ती व मदतनीस यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| 6. | शासन नामनिर्देशित एक सामाजिक कार्यकर्ता | सदस्य |
| 7. | आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना कोकण भवन, नवी मुंबई | सदस्यसचिव |

## जिल्हास्तरीय अडचणी निवारण समिती (ग्रामीण व आदिवासी प्रकल्पांसाठी)

| | | |
|---|---|---|
| 1. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| 2. | जिल्ह्यातील सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी | सदस्य |
| 3. | अंगणवाडी कार्यकर्ती/मदतनीस यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| 4. | राज्य शासनाने नामनिर्देशित केलेला एक सामाजिक कार्यकर्ता | सदस्य |
| 5. | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बा क/ ग्रा पं), जिल्हा परिषद | सदस्य सचिव |

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतील नागरी प्रकल्पांतील कार्यरत अंगणवाडी कार्यकर्ती व मदतनीस यांच्या अडचणी निवारणासंदर्भात समिती स्थापन करण्याबाबतची कार्यवाही वेगळयाने करण्यात येत आहे.

1. केंद्र शासनाच्या निदेशानुसार वर नमूद समित्यांची दर तीन महिन्यानी बैठक बोलाविण्यात यावी
2. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्यास्तव शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्रमांक एबावि 2000/ प्र क्र 237/का 5, दिनांक 15, डिसेंबर 2000 अन्वये जिल्हा, प्रकल्प व ग्राम स्तरावर समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत. योजनेच्या अंमलबजावणीच्या संदर्भात सदर समितीमार्फत घेण्यात आलेल्या निर्णयांची, त्यांनी केलेल्या सूचनांसंबंधीची माहिती बैठकीत देण्यात यावी व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.
3. अंगणवाडी सेविका / मदतनीस यांची वैयक्तिक प्रकरणे सदर बैठकीत उपस्थित करण्यात येऊ नये. अंगणवाडी सेविका / मदतनीस यांच्या कामकाजासंबंधी तसेच त्यांच्या सेवा विषयक अडचणीसंदर्भातील सर्वसाधारण बाबींवर चर्चा करुन त्यावर निर्णय घेण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

20/1/2009

( वि रा वेदपाठक)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई.
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई.
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,कोकण भवन,नवी मुंबई.
विभागीय आयुक्त,कोकण,पुणे,नाशिक,औरंगाबाद,अमरावती,नागपूर.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद.
आयुक्त, महिला व बाल कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
बाल विकास प्रकल्प अधिकारी (ज्येष्ठतम) तथा विभागीय अधिकारी, महिला व बाल विकास, . पुणे,नाशिक, औरंगाबाद,अमरावती, नागपूर.
उपमुख्य कार्यकारी अधिकारी [बाल कल्याण] जिल्हा परिषद
महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती कार्यासन ६

नोंद ३